संजय गांधी निराधार अनुदान योजना व वृध्द भूमीहीन शेतमजुरांना अर्थसहाय्य योजना जिल्हा आस्थापना वेतन व वेतनेतर खर्चासाठी मार्च व एप्रिल, २०२३ करीता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विसयो -२०२३/प्र.क्र.४३/विसयो**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २१ एप्रिल, २०२३.

वाचा :-

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्र.विसयो २०१८/प्र.क्र.६२/ विसयो, दिनांक २०.०८.२०१९.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता संजय गांधी निराधार अनुदान योजना जिल्हा आस्थापनेसाठी रुपये ११७,१८,६२,०००/- (रुपये एकशे सतरा कोटी अठरा लक्ष बासष्ट हजार फक्त) व वृध्द भूमीहीन शेतमजुरांना अर्थसहाय्य या योजनेवरील आस्थापनेसाठी रुपये ४६,७४,७०,०००/- (रुपये शेहेचाळीस कोटी चौऱ्याहत्तर लक्ष सत्तर हजार फक्त ) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. वित्त विभागाने मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ०१-वेतन या उद्दिष्टासाठी संजय गांधी निराधार अनुदान योजना जिल्हा आस्थापनेसाठी रुपये ११,३१,८६,७००/- (रुपये अकरा कोटी एकतीस लक्ष शहाऐंशी हजार सातशे फक्त) व वृध्द भूमीहीन शेतमजुरांना अर्थसहाय्य या योजनेवरील आस्थापनेसाठी रुपये ४,६४,१७,०००/- (रुपये चार कोटी चौसष्ट लक्ष सतरा हजार फक्त) इतका निधी बिम्स प्रणालीवर वितरीत केला आहे. सदरहू निधी सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांना माहे **मार्च व एप्रिल, २०२३** या कालावधीकरीता ०१-वेतन, या उद्दिष्टासाठी या शासन निर्णयान्वये सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सर्व विभागीय आयुक्त यांना कळविण्यात येते की, त्यांनी या सोबत जोडलेल्या विवरणपत्र -अ व ब प्रमाणे वितरीत केलेल्या अनुदानाचे वाटप त्यांच्या अधिपत्याखालील जिल्ह्यांना त्यांच्या आवश्यकतेनुसार करावे व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील तालुक्यांना अनुदानाचे आवश्यकतेनुसार वाटप करावे.

३. सदरहू वितरीत अनुदान संजय गांधी निराधार अनुदान योजना जिल्हा आस्थापनेसाठी "मागणी क्रमांक एन-२, मुख्य लेखाशीर्ष २०५३, जिल्हा प्रशासन ०९३, जिल्हा (०१), सर्वसाधारण आस्थापना" या लेखाशीर्षाखाली आणि वृध्द भूमीहीन

शेतमजुरांना अर्थसहाय्य या योजनेच्या खर्चासाठी "मागणी क्रमांक एन-२, मुख्य लेखाशीर्ष २०५३, इतर प्रशासन ०९४, (०१), इतर आस्थापना, (०१) (०१) वृध्द भूमीहीन शेतमजुरांना अर्थसहाय्य या योजनेवरील आस्थापना खर्च (२०५३ ११७८)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

४. सर्व जिल्हाधिका-यांना कळविण्यात येते की, त्यांनी हा खर्च कोणत्याही परिस्थितीत त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. त्यांनी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून केलेल्या खर्चाचा महालेखापालांच्या कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालून त्याप्रमाणे ताळमेळाचे विवरणपत्राची प्रत या विभागाच्या लेखा परीक्षण कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास त्वरित पाठवावीत व त्याची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. खर्चाच्या ताळमेळाचे काम व्यवस्थितरित्या पार न पाडल्यास, तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास विहित वेळेत सादर न केल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांवर राहील.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३ अन्वये विभागांना दिलेल्या प्रशासकीय प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४२११७०९५१२८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2023.04.21 17:17:34 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती.

विवरणपत्र- अ

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय क्रमांक: विसयो-२०२३/प्र.क्र.४३/विसयो, दिनांक : २१ एप्रिल, २०२३

सोबतचे विवरणपत्र

मागणी क्रमांक एन-**२**, मुख्य लेखाशीर्ष **२०५३,** जिल्हा प्रशासन ०९३**,** जिल्हा (०१)**,** सर्वसाधारण आस्थापना"

माहे **मार्च व एप्रिल, २०२३ करिता** अनुदानाचे वाटप.

**(रुपये रुपयात)**

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | संगणक सांकेताक | ०१ वेतन |
|---|---|---|---|
| १ | पुणे | (०१) (०१) (२०५३ १११३) | १९८४२२०० |
| २ | कोकण | (०१) (०२) (२०५३ ११२२) | १९०५४००० |
| ३ | नाशिक | (०१) (०३) (२०५३ ११३१) | २२०५७३०० |
| ४ | नागपूर | (०१) (०४) (२०५३ ११४२) | १८१५४३०० |
| ५ | अमरावती | (०१) (०५) (२०५३ ११५१) | १९०४६३०० |
| ६ | औरंगाबाद | (०१) (०६) (२०५३ ११६९) | १५०३२६०० |
| | **एकूण** | | **११३१८६७००** |

विवरणपत्र - ब

मागणी क्रमांक एन-**२,** मुख्य लेखाशीर्ष **२०५३,** इतर प्रशासन ०९४, (०१)**,** इतर आस्थापना, **(०१) (०१)** वृध्द भूमीहीन शेतमजुरांना अर्थसहाय्य या योजनेवरील आस्थापना खर्च **(२०५३ ११७८)**" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

माहे **मार्च व एप्रिल, २०२३ करिता** अनुदानाचे वाटप.

**( रुपये रुपयात )**

| **अ.क्र.** | **विभागीय आयुक्त** | ०१- वेतन |
|---|---|---|
| १ | पुणे | ७७३६००० |
| २ | कोकण | ७७३६००० |
| ३ | नाशिक | ७७३६००० |
| ४ | नागपूर | ७७३६००० |
| ५ | अमरावती | ७७३६००० |
| ६ | औरंगाबाद | ७७३७००० |
| | **एकूण** | **४६४१७०००** |